उद्योग संचालनालयाचे संगणकीकरण करणे.

**महाराष्ट्र शासन**
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,
शासन निर्णय क्र.आयएसटी-२००९/प्र.क्र.३८९/उद्योग-३,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २०, ऑक्टोबर, २००९.

वाचा :- शासन निर्णय सम क्रमांक दिनांक ०९ ऑक्टोबर, २००९

**प्रस्तावना** :- उद्योग विभागाचे सक्षमीकरण करण्याच्या दृष्टीने उद्योग संचालनालयाच्या संगणकीकरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय : -**

राज्यातील औद्योगिक विकासाला भरीव व सक्रीय मदत पुरविण्यासाठी तसेच उद्योग संचालनालय, विभागीय कार्यालये व जिल्हा कार्यालये यांना ई गव्हर्नन्स प्रकल्पांतर्गत समांतर जोडणी व संकेतस्थळाचे आधुनिकीकरण करुन उद्योग विभागाचे सक्षमीकरण करण्याची गरज आहे. त्या करिता विविध स्तरावर संगणकीकरण करण्यात येत आहे. तसेच दर्जेदार व्यवस्थापन माहिती पध्दत सुरु करुन डाटा बँक स्थापन करुन विभागाची माहिती पाठविण्याची क्षमता आणखी वाढवून लघु उद्योग घटकांची नोंदणी व सांविधिक विवरणपत्राचे सादरीकरण ऑनलाईन पध्दतीने करण्याचे प्रस्तावित आहे. यास्तव उद्योग संचालनालयाचे संगणकीकरण या योजनेस शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेसाठी होणारा रु.४.०० लाख इतका खर्च मागणी क्रमांक -के - ०७, २८५१ - ग्रामोद्योग व लघुउद्योग ००-००१ संचालन व प्रशासन, उद्योग संचालनालयाचे संगणकीकरण, १७ - संगणक खर्च (२८५१५३५३) (योजनेंतर्गत) (दत्तमत) या लेखाशीर्षाखाली सन २००९-२०१० या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४६४/०९, व्यय-१६ दिनांक ३०.०५.२००९ अन्वये तसेच नियोजन विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(अंजली भावे)
शासनाच्या अवर सचिव.

प्रत,

विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई /
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
वित्त विभाग, अर्थसंकल्प-१४/व्यय-१६.
नियोजन विभाग, (का-१४६१) कक्ष अधिकारी, (प्रशासन-१/५) उ,ऊ.व का.वि.
निवड नस्ती, (उद्योग-३)